**स्वातंत्र्याच्या अमृत महोत्सव अंतर्गत पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालयांतर्गत गड, किल्ले, राज्य संरक्षित स्मारके यांच्या देखभाल दुरुस्तीची तसेच वस्तुसंग्रहालयांचे देखरेख व संनियंत्रण करण्यासाठी वेब पोर्टल तयार करण्याकरिता प्रशासकिय मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग

**शासन निर्णय क्रमांक : स्मारक-२०२४/प्र.क्र.१०५/सां.का.३**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १५ मार्च, २०२४.

**वाचा :-** शासन पत्र, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग संकीर्ण-८२२२/प्र.क्र.४१३/सां.का.४, दि.०४.०३.२०२४.

**प्रस्तावना :-**

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव अंतर्गत मा.मंत्री (सां.का.) यांच्या अध्यक्षतेखालील कोअर समितीच्या दि.०६.०२.२०२४ रोजीच्या बैठकीत संदर्भाधीन पत्रानुसार पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालयांतर्गत गड, किल्ले, राज्य संरक्षित स्मारके यांच्या देखभाल दुरुस्तीचे संनियंत्रण करण्यासाठी पोर्टल तयार करण्याकरिता रु.२५.०० लक्ष इतक्या निधीस मान्यता देण्यात आली आहे.

पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालयांतर्गत राज्यात एकूण ३८७ राज्य संरक्षित स्मारके व १३ वस्तुसंग्रहालये आहेत. महाराष्ट्र प्राचीन स्मारके व पुराणवस्तुशास्त्र विषयक स्थळे व अवशेष अधिनियम, १९६० अन्वये या राज्य संरक्षित स्मारकांचे जतन व संवर्धन केले जाते. संचालनालयांतर्गत सहायक संचालक, रत्नागिरी, पुणे, नाशिक, औरंगाबाद, नांदेड, नागपूर या विभागीय कार्यालयांमार्फत तसेच संग्रहालयांसाठी विभागीय अभिरक्षक कार्यालयांमार्फत कामे केली जातात. राज्य संरक्षित स्मारकांच्या जतन-संवर्धनाची कामे मोठ्या प्रमाणावर हाती घेण्यात आली आहे. तसेच नमो-११ कार्यक्रमांतर्गत ७३ ऐतिहासिक स्थळे/मंदिरांची कामे हाती घेण्यात आलेली आहेत. मराठा लष्करी स्थापत्य, सागरी किल्ले, कातळशिल्पे करिता युनेस्को जागतिक नामांकनासाठी प्रस्ताव पाठविण्यात आलेला आहे. यापैकी मराठा लष्करी स्थापत्याचा युनेस्को जागतिक नामांकनाचा प्रस्ताव भारत सरकारने युनेस्कोला पाठविला आहे. त्याचप्रमाणे महावारसा, वैभव संगोपन योजना यांची देखील संचालनालयामार्फत अंमलबजावणी करण्यात येत आहे. संचालनालयामार्फत हाती घेण्यात आलेल्या विविध उपक्रम/कामांच्या संनियंत्रणासाठी वेब पोर्टल तयार करणे अत्यंत आवश्यक झाले आहे. सबब संचालनालयांतर्गत सर्व कामांची प्रक्रिया ऑनलाईन करुन त्या माध्यमातून कामांवर देखरेख व संनियंत्रण ठेवण्यासाठी वेब पोर्टल तयार करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सवांतर्गत कोअर समितीने दिलेल्या मान्यतेनुसार पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालयांतर्गत गड, किल्ले, राज्य संरक्षित स्मारके यांच्या देखभाल दुरुस्तीचे तसेच वस्तुसंग्रहालयांचे देखरेख/संनियंत्रण करण्यासाठी वेब पोर्टल तयार करण्याकरिता रु.२५,००,०००/- (अक्षरी रुपये पंचवीस लक्ष फक्त) लक्ष इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता

०२. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर काम योग्य पध्दतीने दर्जात्मक रित्या पूर्ण होईल, हे पाहण्याची जबाबदारी संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांची असेल.

०३. या कामासाठी होणारा खर्च मागणी क्र. झेड्डी-०२, २२०५ कला व संस्कृती, १०२ कला व संस्कृती प्रचालन, (१३) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव (१३) (०१) स्वातंत्र्याच्या अमृत महोत्सवांतर्गत कार्यक्रम (कार्यक्रम) (२२०५ ३७३३), ५० इतर खर्च या लेखाशिर्षाखाली त्या त्या आर्थिक वर्षातील उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा.

०४. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग २, दिनांक १७ एप्रिल, २०१५ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ६ मधील परिच्छेद क्र. २७(२) "अ" नुसार तसेच वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१५१८५९३०१७२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDA MARUTI RAUT

Digitally signed by NANDA MARUTI RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT,
2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a186620ec03666d244838270, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=BAF9D9317025580944685E047B9C52D64C532684054F19E1F02C374B78E1773F, cn=NANDA MARUTI RAUT
Date: 2024.03.15 19:08:48 +05'30'

**( नंदा राऊत )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. उप सचिव (सां.का. ३), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अवर सचिव (सां.का.४), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.

८. महालेखापाल-२, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९. महालेखापाल-१, (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०.महालेखापाल-२, (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
११.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१४.निवड नस्ती, सां.का.३.